**विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या मृत्यू-नि-सेवानिवृत्ति उपदानावर व्याज देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन

## वित्त विभाग

शासन निर्णय क्रमांक सेनिवे-१०८५/सीआर-१८४५/सेवा-४

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २३ जून १९८६

## शासन निर्णय

सेवानिवृत्त शासकीय कर्मचाऱ्यांना मृत्यू-नि-सेवानिवृत्ति उपदान द्यावयास जर विलंब लागला तर त्यावर व्याज देण्याचा प्रश्न शासनाच्या काही काळ विचाराधीन होता. त्याबाबत विचार करून शासनाने असा निर्णय घेतला आहे की, उपदानाच्या रकमेचे प्रदान करण्यास विलंब लागल्यास अशा उपदानावर ते देय झाल्यापासून तीन महिने ते एक वर्षापर्यंतच्या कालावधीसाठी, दरवर्षी ७ टक्के या दराने व एक वर्षानंतरच्या कालावधीसाठी दरवर्षी १० टक्के या दराने, व्याज देण्यात यावे व ते ज्या महिन्यात उपदानाचे प्रत्यक्ष प्रदान करण्यात आले असेल त्याच्या लगतपूर्वीच्या महिना अखेरपर्यंत देण्यात यावे. जेथे मृत्यू-नि-सेवानिवृत्ति उपदानाच्या प्रदानास प्रशासनिक चुकीमुळे किंवा संबंधित शासकीय कर्मचाऱ्यांच्या नियंत्रणाबाहेरील कारणांमुळे विलंब झाला असे स्पष्टपणे प्रस्थापित झाले असेल, अशाच प्रकरणी व्याज देण्यात येईल. व्याज प्रदानाच्या प्रत्येक प्रकरणावर संबंधित प्रशासकीय विभाग, वित्त विभागाच्या सल्ल्याने विचार करील व त्यावर शासनाची मंजुरी घेऊन व्याजाचे प्रदान प्राधिकृत करील. व्याज द्यावयाचे आहे अशा सर्वच प्रकरणांत विलंबासंबंधीची जबाबदारी निश्चित करण्यासाठी कार्यवाही करण्यात यावी व त्यास जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात यावी.

२. निवृत्तिवेतनाची प्रकरणे निकालात काढण्याकरिता महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील प्रकरण १० मध्ये तपशीलवार वेळापत्रक नेमून देण्यात आले आहे. नियमाप्रमाणे उपदान हे सेवानिवृत्तीनंतर लगेचच देय होते. सेवेत असतानाच मृत्यू पावणाऱ्या शासकीय कर्मचाऱ्यांच्या बाबतीत कुटुंब निवृत्तिवेतन व मृत्यू-नि-सेवानिवृत्ति उपदान अंतिमतः निश्चित करण्यासाठी, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील प्रकरण १२ मध्ये तपशीलवार वेळापत्रक नेमून देण्यात आले आहे.

३. जेथे सेवानिवृत्तीच्या तारखेला शासकीय कर्मचाऱ्यांविरुद्ध शिस्तभंगाची किंवा न्यायिक कार्यवाही प्रलंबित असेल त्या प्रकरणी, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील नियम १३० अन्वये तात्पुरते निवृत्तिवेतन प्राधिकृत करण्यात येते. अशा प्रकरणांत कार्यवाही पूर्ण होऊन त्याबाबत अंतिम आदेश निर्गमित होईपर्यंत उपदानाचे प्रदान करण्यात येत नाही. कार्यवाही पूर्ण झाल्यानंतर सक्षम प्राधिकाऱ्याने जर उपदानाचे आहरण करण्यास परवानगी दिली तर विलंबाने प्रदान केलेल्या उपदानावरील व्याजाच्या प्रदानासाठी सेवानिवृत्तीच्या तारखेच्या लगतनंतरच्या तारखेस, ते देय झाले आहे असे मानले जाईल. मात्र, ज्या शासकीय कर्मचाऱ्यांविरुद्ध न्यायिक/शिस्तभंगाची कार्यवाही चालू असताना ते मृत्यू पावले व परिणामतः त्यांच्या विरुद्धची अशी कार्यवाही बंद करण्यात आली, त्यांना या आदेशाचा फायदा मिळणार नाही.

४. सेवानिवृत्तीनंतर वेतनात झालेल्या वाढीमुळे किंवा शासकीय कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीच्या तारखेपूर्वीच्या दिनांकापासून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मध्ये शिथिलीकरण झाल्यामुळे, देय होणाऱ्या उपदानाच्या थकबाकीच्या रकमेवर या शासन निर्णयात अंतर्भूत असलेल्या तरतुदी लागू होणार नाहीत.

५. हे आदेश १ मे १९८६ पासून अंमलात येतील. जे शासकीय कर्मचारी या तारखेच्या पूर्वी सेवानिवृत्त झाले/सेवेत असताना मृत्यू पावले त्यांच्या प्रकरणी हा शासन निर्णय निर्गमित होण्याच्या तारखेस जर मृत्यू-नि-सेवानिवृत्ति उपदानाचे प्रदान करण्यात आले नसेल व त्यांच्या सेवानिवृत्तीच्या/मृत्यूच्या तारखेस ते प्रदान करण्यास तीन महिन्यांपेक्षा जास्त विलंब लागला असेल तर, अशा प्रकरणी हे आदेश लागू होतील. मात्र अशा प्रकरणांत हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या तारखेपासून तीन महिने किंवा सेवानिवृत्तीच्या/मृत्यूच्या तारखेपासून तीन महिने, यापैकी जी नंतरची तारीख असेल, त्या तारखेपासून व्याज प्रदान करण्यात येईल.

६. यासोबत जोडलेल्या अधिसूचनेप्रमाणे (इंग्रजी व मराठी) महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मध्ये एक नवीन नियम १२९-ए अंतर्भूत करण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**श्यं. दे. पानसे,**
शासनाचे सह सचिव.

[मागे पहा

(शा.म.मु.) एच २८०५/ए-४-१२,००५—६-८६

**प्रत रवाना---**

भारत सरकारचे सचिव, वित्त मंत्रालय, नवी दिल्ली,
महालेखापाल--१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल--२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल--१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल--२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त, व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, वाशी, नवी मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड फाईल, कार्यासन सेवा--४.

*पत्राद्वारे.

१९८६ चा क्रमांक

## वित्त विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २३ जून १९८६

**भारताचे संविधान**

क्रमांक सेनिवे. १०८५/सीआर-१८४५/सेवा-४.—भारताच्या संविधानाचा अनुच्छेद ३०९ यांच्या परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून महाराष्ट्राचे राज्यपाल महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ ला सुधारणा करणारे पुढील नियम करीत आहेत :—

१. या नियमास महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) (पहिली सुधारणा) नियम, १९८६ असे म्हणावे.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मध्ये, नियम १२९ नंतर, खालीलप्रमाणे नियम १२९-ए अंतर्भूत करण्यात येईल :—

"१२९-ए. विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या उपदानावर व्याज—

(१) जर उपदानाचे प्रदान ते देय झाल्याच्या तारखेपासून तीन महिन्यानंतर प्राधिकृत करण्यात आले असेल आणि रक्कम प्रदान करण्यातील विलंब हा प्रशासनिक चुकीमुळे झाला असे स्पष्टपणे प्रस्थापित झाले असेल तर, उपदानाच्या रकमेवर तीन महिन्यानंतरच्या कालावधीसाठी खालील दराने व्याज देण्यात येईल :—

(एक) तीन महिन्यानंतर व एक वर्षपर्यंत .. दरसाल ७ टक्के.

(दोन) एक वर्षानंतर .. .. दरसाल १० टक्के.

मात्र या प्रकरणात नेमून दिलेल्या कार्यपद्धतीचे पालन करण्यात शासकीय कर्मचाऱ्याने कसूर केल्यामुळे उपदान प्रदान करण्यातील विलंब झालेला नसावा.

(२) विलंबाने प्रदान करण्यात आलेल्या उपदानाच्या प्रत्येक प्रकरणावर संबंधित प्रशासकीय विभाग "स्वाधिकारे" विचार करील आणि उपदान प्रदान करण्यातील विलंब हा प्रशासनिक चुकीमुळे झाला याबद्दल विभागाची खात्री झाली असेल, तर तो विभाग व्याज प्रदान करण्यासाठी वित्त विभागाकडे शिफारस करील.

(३) विभागाने पोट-नियम (२) अनुसार केलेली शिफारस, वित्त विभागाने स्वीकारल्यास संबंधित विभाग व्याज प्रदान करण्याकरिता शासनाची मंजुरी देईल. "

(४) वित्त विभागाच्या संमतीने जेथे व्याजाचे प्रदान प्राधिकृत करण्यात आले असेल अशा सर्व प्रकरणांत, उपदान प्रदानाचे विलंबास जबाबदार असल्याचे आढळून आलेल्या संबंधित शासकीय कर्मचाऱ्यावर अथवा कर्मचाऱ्यांवर संबंधित प्रशासकीय विभाग जबाबदारी निश्चित करून त्यांचे विरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करील.

(५) शासकीय कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीनंतर घेण्यात आलेल्या शासनाच्या निर्णयाचा परिणाम म्हणून त्याला त्याच्या सेवानिवृत्तीनंतर अगोदरच प्रदान करण्यात आलेल्या उपदानाच्या रकमेत—

(ए) अगोदरच प्रदान करण्यात आलेले उपदान ज्या वेतनावर निर्धारित करण्यात आले त्यापेक्षा जास्त वेतन देण्यात आल्यामुळे, किंवा

(बी) संबंधित शासकीय कर्मचाऱ्यांच्या सेवानिवृत्तीच्या तारखेपूर्वीच्या दिनांकापासून या नियमांच्या तरतुदीचे शिथिलीकरण करण्यात आल्यामुळे;

जर वाढ झाली तर, उपदानाच्या थकबाकीवर व्याज दिले जाणार नाही."

३. वरील नियम १ मे १९८६ पासून अमलात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**व्यं. दे. पानसे,**
शासनाचे सह सचिव.

## FINANCE DEPARTMENT

Mantralaya, Bombay 400 032, dated 23rd June 1986

CONSTITUTION OF INDIA

No. PEN-1085/CR-1845/SER-4.—In exercise of the powers conferred by the proviso to article 309 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following rules further to amend the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, namely:—

1. These rules may be called the Maharashtra Civil Services (Pension) (First Amendment) Rules, 1986.

2. In the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, after rule 129, the following shall be inserted as Rule 129-A:—

"129-A. Interest on delayed payment of gratuity—

(1) If the payment of gratuity has been authorised after three months from the date when its payment became due and it is clearly established that the delay in payment was attributable to administrative lapse, interest at the following rate on the amount of gratuity in respect of the period beyond three months shall be paid:—

(*i*) beyond 3 months and upto one year .. 7% per annum.

(*ii*) beyond one year .. .. .. 10% per annum.

Provided that the delay in the payment was not caused on account of failure on the part of the Government servant to comply with the procedure laid down in this Chapter.

(2) Every case of delayed payment of gratuity shall, *suo motu*, be considered by the concerned Administrative Department, and where the Department is satisfied that the delay in the payment of gratuity was caused on account of administrative lapse, that Department shall make a recommendation to the Finance Department for the payment of interest.

(3) If the recommendation of the Department made under sub-rule (2) is accepted by the Finance Department, the Department concerned shall issue Government sanction for the payment of interest.

(4) In all cases where the payment of interest has been authorised with the concurrence of the Finance Department, the Department concerned shall fix the responsibility and take disciplinary action against the Government servant or servants concerned who are found responsible for the delay in the payment of gratuity.

(5) If as a result of Government's decision taken subsequent to the retirement of a Government servant, the amount of gratuity already paid on his retirement is enhanced on account of —

(*a*) grant of pay higher than the pay on which gratuity, already paid, was determined,

*or*

(*b*) liberalisation in the provisions of these rules from a date prior to the date of retirement of the Government servant concerned,

no interest on the arrears of gratuity shall be paid"

3. The above rule shall be effective from 1st May 1986.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V. D. PANSE,
Joint Secretary to Government.